## मिहान प्रकल्प,नागपूर करिता अतिरिक्त जमीन संपादित करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग.
शासन निर्णय व क्रमांक : एव्हीएन १००८/प्र.क्र.१७१/०८/२८-अ
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक : १० मार्च,२०१०

**संदर्भ :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एव्हीएन१००१/ प्रकल्प १०५/०१/२८अ,दिनांक ४ जानेवारी, २०१०**
**२) शासन निर्णय, सामान्य प्रशासनविभाग,क्रमांकएव्हीएन१००५/ प्र.क्र.१६६/०५/२८अ,दि.२६ जून,२००६ आणि दि. ४ जुलै,२००९.**
**३) शासनाचे समक्रमांकाचे दिनांक ३१ जानेवारी,२००९ चे पत्र**
**४) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित,मुंबई यांचे क्र. म.वि.वि.कं./मिहा/१०२/ ९५०, दिनांक ५ऑगस्ट,२००९चे पत्र.**

**प्रस्तावना :**

शासनाने मिहान प्रकल्प,नागपूर करिता संदर्भाधीन शासन निर्णय दि. ४ जानेवारी,२००२ अन्वये अंदाजे २५५६ हेक्टर खाजगी जमीन आणि शासन निर्णय दि. २६ जून,२००६ व दि. ४ जुलै,२००९ अन्वये ८८७.९६ हे. खाजगी जमीन आणि १८०.२५हे. शासकीय जमीन तसेच अशी एकूण १०६८.२१ हे. जमीन संपादित करण्यास प्रशासकीय मान्यता दिली आहे.

खापरी (रेल्वे ),नागपूर येथील गावठाणाचे भूसंपादन मिहान प्रकल्पांतर्गत प्रस्तावित नाही. तथापि, मिहान प्रकल्पबाधितांच्या आणि लोकप्रतिनिधींनी केलेल्या मागणीनुसार खापरी (रेल्वे), नागपूर येथील गावठाण क्षेत्राचे संपादन / पुर्नवसन करण्यासंबंधी आवश्यक ती कार्यवाही करण्याबाबत महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित,मुंबई यांना दि. ३१ जानेवारी,२००९ च्या शासन पत्रान्वये कळविण्यात आले होते. त्यास अनुसरुन महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांनी संदर्भाधीन दि. ५ ऑगस्ट,२००९ च्या पत्रान्वये
मिहान प्रकल्पाकरिता खापरी (रेल्वे) नागपूर गावठाणातील सर्व्हे क्रमांक २२७ आराजी २.४१

हे.आर. आणि सर्व्हे क्रमांक २२८ आराजी ०.८१ हे आर अशी एकूण ३.२२हे आर गावठाणच्या जमीनीच्या संपादनास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत प्रस्तावित केले आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :** नागपूर येथील आंतरराष्ट्रीय प्रवासी व माल वाहतून विमानतळ (मिहान प्रकल्प)विकसित करण्यासाठी मोजा ,खापरी (रेल्वे) नागपूर येथील गावठाणातील अतिरिक्त संपादित करावयाच्या खालीलप्रमाणे एकूण ३.२२ हे आर जमीनीच्या संपादनास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच या भूसंपादनासाठी जिल्हाधिकारी नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | गावाचे नाव/सर्व्हे क्रमांक | संपादित करावयाची जमीन (हेक्टर आर) |
|---|---|---|
| १ | खापरी (रेल्वे ), नागपूर सर्व्हे क्र. २२७ आराजी | २.४१ |
| २ | खापरी (रेल्वे ), नागपूर सर्व्हे क्र. २२८ आराजी | ०.८१ |
| | एकूण | ३.२२ |

२. उपरोक्त भूसंपादनावरील खर्च महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांनी स्वत:च्या निधीतून करावा, त्यासाठी शासनाकडून कोणतेही अनुदान मंजूर करण्यात येणार नाही.

३. सदर जमीन संपादनामुळे प्रकल्पाबाधित होणा-या बाधित घरांचे आणि बाधितांचे पुनर्वसनासाठी अतिरिक्त भूसंपादनाची आवश्यकता भासल्यास आवश्यक जमीन संपादनाचा प्रस्ताव शासनाकडे महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित यांनी सादर करावा.

४. सदर शासन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov in वर उपलब्ध असून त्यांचा संगणक सांकेतांक २०१००३१०१४०८४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

( अं.वि.अंभिरे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपालांचे सचिव,राजभवन,मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई,
३) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई
४) अपर मुख्य सचिव (महसूल) ( मदत व पुनर्वसन ) , महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई,
५) प्रधान सचिव (वित्त ),वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
६) प्रधान सचिव (नियोजन),नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
७) प्रधान सचिव(१)/सचिव (२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सचिव ( विमान चालक) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
९) उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी मर्यादित,
८ वा मजला , वर्ल्ड ट्रेड सेंटर , कफ परेड, मुंबई
१०) विभागीय आयुक्त, नागपूर,
११) जिल्हाधिकारी ,नागपूर,
१२) उप सचिव (विमान चालन) ,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता आणि लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२ ,नागपूर
१४) निवड नस्ती